सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामधील सन २०१५-१६ च्या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१६/प्र.क्र.१७४/पापु-१४

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीखः २९ नोव्हेंबर, २०१६

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९
३) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.२१२/पापु-१४, दिनांक ८ मे, २०१२
४) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१२/प्र.क्र.३७७/पापु-१४, दिनांक ७ डिसेंबर, २०१२ व दिनांक ५.५.२०१५
५) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता, विभाग क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.४१८/ पापु-१४, दिनांक ४.०१.२०१४
६) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.४८/पापु-१४, दिनांक ६.०५.२०१४
७) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१६/प्र.क्र.१४३/ पापु-१४, दिनांक ४.०५.२०१६
८) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांकः एससीवाय /०५२०१६.क्र.प्र/३९११-म/, दिनांक २६ मे, २०१६ दिनांक १४ जुलै, २०१६ व दि. २५ नोव्हेंबर, २०१६
९) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्रमांक उपआ/विकास/पाणी टंचाई/ अका/ कावि/५६७/२०१६, दिनांक २५ मे,२०१६

१०) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्रमांक ससंता /कावि /५१६/१६, दिनांक २६ ऑगस्ट, २०१६
११) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्रमांकः लेखा/कक्ष/२३/२/नै.आ/कावि/३३३२०, दिनांक २५ जुलै, २०१६.
१२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांकः जा.क्र: २०१६/मशाका/पाटं/सिआर -३१, दिनांक २४ ऑक्टोबर,२०१६.
१३) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्रमांकः विशा/शा.अ.१/सीआर ०८/२०१५, दिनांक ०५ एप्रिल,२०१६.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण व नागरी पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च "२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाकरीता महसूल व वन विभागाने पिण्याच्या पाण्याची टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांसाठी उपलेखाशिर्ष २२४५००९३ अंतर्गत महसूल व वन विभागाने त्यांच्या दिनांक २५ नोव्हेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये **एकूण रु. २९२५२.०१ लक्ष** इतका निधी विभागास उपलब्ध करुन दिला आहे.

विभागीय आयुक्त यांच्या संदर्भ क्रमांक ९ ते १३ मधील पत्रांद्वारा निधी मागणीचा प्रस्ताव या विभागास प्राप्त झाला होता. त्यानुसार या विभागाने केलेल्या मागणीनुसार महसूल व वन विभागाने महसूल विभाग निहाय व उपाययोजनांनिहाय निधी उपलब्ध करून दिला आहे. सन २०१५-१६ च्या टंचाई कालावधीतील केलेल्या/करावयाच्या उपाययोजनांसाठी महसूल व वन विभागाने उपलब्ध करून दिलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी विवरणपत्र 'अ' मध्ये नमूद केल्याप्रमाणे **रुपये २९२५२.०१ लक्ष (रुपये दोनशे ब्याण्णव कोटी बावन्न लाख एक हजार फक्त**) इतका निधी विभागीय आयुक्त, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर व पुणे यांना प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

## अटी व शर्ती

१) विभागीय आयुक्त, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर यांनी सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करतांना तो उपाययोजनानिहायच वितरीत होईल याची दक्षता घ्यावी.

२) सन २०१५-१६ या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच, या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा.अन्य टंचाई कालावधीतील उपाययोजनांसाठी सदर निधी खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.

३) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

४) ज्या उपाययोजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहेत, त्या उपाययोजनांसाठीचा निधी जिल्हा परिषदेकडे वितरीत करण्यात येऊ नये, सदर निधी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी योजना राबविणाऱ्या संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचेकडे तात्काळ वितरीत करावा. तसेच ज्या उपाययोजना महानगरपालिका/ नगरपालिका / नगरपरिषद यांच्या मार्फत राबविण्यात येत असतील त्या योजनांसाठीचा निधी संबंधित नगरपालिका / नगरपरिषद यांच्या मुख्याधिकारी यांना वितरीत करावा.

५) यापुढे टंचाई निवारणार्थ उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे त्याबाबत बाब निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादि बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

६) सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी देण्यात आला आहे, त्यातून देयके अदा करताना टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असणे व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फे-या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या बनावट ठरतील व त्यासाठी सदर अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद

होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांस निधी वितरीत करण्यात येऊ नये.

७) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्त शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच **कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही** याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

८) सदर निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे.तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करून बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

९) **याबाबतचा खर्च “मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ ००९३) (दत्तमत)(वेतनेत्तर) ३१, सहायक अनुदाने" या उपलेखाशीर्षांमधून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१०) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील विभागनिहाय तसेच उपाययोजनानिहाय पुढीलप्रमाणे आहे. याप्रमाणेच विभागीय आयुक्तांनी जिल्हाधिकाऱ्यांना उपयोजनानिहायच निधीचे वितरण करावे.

## विवरणपत्र -अ

(रक्कम रुपये लाखात)

| योजना | नाशिक | औरंगाबाद | अमरावती | नागपूर | पुणे | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| नविन विंधन विहिर घेणे | ०.०० | ७३२.९४ | २१०.९९ | ५०९.१० | २२५.०० | १६७८.०३ |
| नळ योजनांची विशेष दुरुस्ती | ०.०० | ९४८.०५ | ९११.७२ | ६८०.५२ | ७४०.०० | ३२८०.०९ |
| विंधन विहिरींची विशेष दुरुस्ती | ०.०० | ९३.७५ | ०.०० | ३०.०३ | ११७.०० | २४०.७८ |
| तात्पुरत्या नळ पाणी पुरवठा योजना | ०.०० | ७२६.५७ | २१९.७९ | २६.४८ | १०५.०० | १०७८.०२ |
| टँकरने पाणी पुरवठा | ९३०.२५ | १६०३३.६६ | २७९.७९ | २.६८ | ५६३.८३ | १७८४०.२१ |
| विहिर अधिग्रहण | १०५.९२ | ३९१३.६९ | २२५.४० | १३२.०२ | ११५.२० | ४४९२.२३ |
| विहिरी खोल/गाळ काढणे | ०.०० | ५९.७३ | ३.७३ | ०.०० | १७४.३३ | २३७.७९ |
| बुडक्या घेणे | ०.०० | १४.८८ | ०.०० | ०.०० | ०.०० | १४.८८ |
| नागरी भागासाठी | ०.०० | २४८.७८ | ११८.५१ | २२.४९ | ०.०० | ३८९.७८ |
| एकूण | १०३६.१७ | २२७७२.०५ | १९७०.११ | १४३३.३२ | २०४०.३६ | २९२५२.०१ |

**टिप :** १. टँकरने पाणी पुरवठा या उपाययोजने अंतर्गत औरंगाबाद विभागासाठी वितरीत केलेल्या निधीमध्ये लातूर शहरासाठी टँकरने पाणी पुरवठा यासाठी निधीचा समावेश आहे.

२. अमरावती विभागातील नागरी भागासाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीमध्ये नांदूरा शहर तातडीची पाणी पुरवठा योजनेसाठीच्या उर्वरित निधीचा समावेश आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१६११२८१३०२५९९२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2016.11.29 15:10:45 +05'30'

(म. भ. सावंत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,

६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, ( सर्व )
९. जिल्हाधिकारी, (सर्व )
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ( सर्व )
११.आयुक्त, महानगरपालिका लातूर
१२.मुख्याधिकारी, नगरपरिषद नांदुरा
१३.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
१४.उप सचिव / पापु-१४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
१५.पापु-१४ संग्रहासाठी.